**रामपूर लपा योजना ता.अक्कलकुवा जि.नंदूरबार या योजनेस रु.३९.७३ कोटी इतक्या किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०२०/(४०२/२०२०)/ ल.पा.**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २० सप्टेंबर, २०२१

**पहावे :-**

१) कार्यकारी अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ , जळगाव जा. क्र.कासं/ तापाविम/प्रशा-२ /४७३९/सन २०२० दि. २३/१०/२०२०

२) वित्त विभागाचे पत्र क्र.व्यअस २०२१/प्र.क्र.१०१/अर्थ-२ दि.२०.८.२०२१

**प्रस्तावना:-**

रामपुर लघु पाटबंधारे प्रकल्प हा तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव अंतर्गत तापी खोऱ्यातील स्थानिक नाल्यावर नंदुरबार जिल्ह्यात अक्कलकुवा तालुक्यात रामपुर गावाजवळ आहे. सदर प्रकल्पाची एकूण साठवण क्षमता ३.२८५ दलघमी इतकी आहे. त्यापैकी २.९९६ दलघमी इतका उपयुक्त पाणीसाठा आहे. सदर प्रकल्पाव्दारे नंदुरबार जिल्ह्यातील अक्कलकुवा तालुक्यातील ७ गावांतील एकुण ३८२ हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळणार आहे.

रामपुर लघु पाटबंधारे या योजनेस शासन निर्णय क्र. एम आय डब्ल्यु ११८०/११२१/२६८/८० लपा ४ दि.११.१२.१९८० अन्वये रु. ०.३९३ कोटी इतक्या किमतीस दरसूची १९७९-८० नुसार मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानंतर शासन निर्णय क्र. लपायो/१५९५/३९/९५/ खारभूमी दि.२९.१०.१९९६ अन्वये रु. ३.५१ कोटी इतक्या किमतीस दरसूची १९९५-९६ नुसार पुन:प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, भूसंपादनातील वाढ , नविन कामे प्रस्तावित केल्याने वाढ, इतर कारणामुळे झालेली वाढ, आस्थापना व अनुषंगिक खर्च या कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ होत असल्यामुळे योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे. याचा विचार करता या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१८-२०१९ वर आधारित रु.३९.७३ कोटी इतक्या किंमतीस व्यय अग्रक्रम समितीच्या दि.१२ जुलै, २०२१ रोजी मान्यतेनुसार प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय खालीलप्रमाणे घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

रामपूर लपा योजना ता.अक्कलकुवा जि.नंदूरबार, या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१८-१९ वर आधारित रु.३९.७३ कोटी (रूपये एकोणचाळीस कोटी त्र्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी एकूण रु.३६.८१ कोटी व अनुषंगीक खर्च २.९२ कोटी) खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) संपूर्ण प्रकल्प हा प्रस्तावित प्रथम सु.प्र.मा.किंमतीच्या मर्यादेत करण्याची जबाबदारी/हमी महामंडळाची राहील.

२) सदर प्रकल्पाच्या प्रथम सु प्र मा प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

३) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात जलसंपदा विभागाने प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची जबाबदारी संपूर्णपणे महामंडळाची राहील.

४) सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपद्धतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाहय कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना शासनाने सहमती दिली आहे असे म्हणता येणार नाही व अशी कोणतीही सहमती / मान्यता शासनाने प्रस्तुत प्रकल्पाबाबत दिलेली नाही. अशा प्रत्येक प्रकरणी व अशा प्रत्येक बाबीवर महामंडळाने विहित कार्यपध्दती अनुसरुन सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता घेणे आवश्यक राहील.याबाबतची संपूर्णपणे जबाबदारी महामंडळाची राहील.

५) प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.

६) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी अथवा निविदाविषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही. तसेच सुधारित प्रशासकीय मान्यता देणारे प्राधिकारी हे झालेल्या क्षेत्रीय निर्णयास व अनियमिततेस जबाबदार नसतील याबाबतची जबाबदारी निर्णय घेणाऱ्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील, अशा तांत्रीक व निविदा विषयक प्रकरणांची तपासणी त्यावेळी प्रचलित शासन निर्णयानुसार करणे आवश्यक असून याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

७) सदर प्रकल्पावर लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात यावी.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र.आय-५ प्रधान लेखाशिर्ष,"४७०२लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, (८०) सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका(००),(००)(०३) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (लहान पाटबंधारे) (कार्यक्रम),५४-गुंतवणुका (४७०२ ४९२७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. .

सदर शासन निर्णय दिनांक १२/०७/२०२१ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या अनुषंगाने तसेच नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारिक संदर्भ क्र.७८/२०२१, दिनांक २७/०४/२०२१ अन्वये तसेच वित्त विभागाच्या (कार्यासन व्यय-१२) अनौपचारिक संदर्भ क्र.१६८/२०२१, दिनांक ३१/०५/२०२१ अन्वये सहमती दिलेली आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २१४ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१०९२०१२५३३२३२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUSHMA RAJEEV KUDAL

Digitally signed by SUSHMA RAJEEV KUDAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=141f90147d17022d798b6637e56a21addf9ccec2a8e873c94cc236bef5f7f1ba, pseudonym=F502745DAE0A188EA35CEF7CBBA863E3F275CE05, serialNumber=C8CC8BFFF37E7B2B7D657FAC2292A9D0123EC09BF0611AA0BFBE88FE5600C519, cn=SUSHMA RAJEEV KUDAL
Date: 2021.09.20 12:57:54 +05'30'

**( सुषमा कुडल )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

सहपत्र :- परिशिष्ट "अ"

**प्रत,**

१. मा मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेते, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
७. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगाव
८. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, जळगाव
९. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१०. आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. जिल्हाधिकारी, नंदूरबार.
१२. अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे
१३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
१४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
१५. अर्थशाखा १/२ जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१७. लपा कार्यासन संग्रहार्थ.

# परिशिष्ट-अ

## रामपूर लपा योजना ता.अक्कलकुवा जि.नंदूरबार या योजनेस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०२०/(४०२/२०२०)/ ल.पा. दिनांक: २०/ ०९/२०२१ चे परिशिष्ट

## उपशिर्षनिहाय तरतूदी

(किंमत रू. कोटी)

| उपशिर्ष | मंजुर पुन: प्रमा नुसार (दरसुची १९९५-९६) | प्रस्तावित प्रथम सुप्रमा मधील तरतुद (दरसुची २०१८-१९) | वाढ /बचत |
|---|---|---|---|
| [A] शीर्ष कामे: | | | |
| अ-प्राथमिक | ० | ०.०६ | ०.०६ |
| ब- भूसंपादन | ०.४६ | ५.५८ | ५.१२ |
| सी-कामे | १.७३ | २३.९३ | २२.२० |
| डी- रेग्युलेटर | ०.१८ | १.६० | १.४२ |
| के-इमारती | ०.०२ | ०.०६ | ०.०४ |
| एम वृक्षारोपन | ० | ०.०३ | ०.०३ |
| ओ-संकिर्ण | ०.०१ | ०.१४ | ०.१३ |
| पी-देखभाल | ०.०१ | ०.२६ | ०.२५ |
| आर- दळणवळण | ० | ०.९१ | ०.९१ |
| एकूण (A) | २.४१ | ३२.५७ | ३०.१६ |
| [ब] कालवे व वितरण व्यवस्था (बंदनलिका वितरण प्रणाली) | | | |
| अ-प्राथमिक | ० | ०.११ | ०.११ |
| ब- भूसंपादन | ०.०८ | ०.०७ | -०.०१ |
| क कामे ते एल मातीकाम-कालवा/पीडीएन कामे | ०.३२ | ३.९५ | ३.६३ |
| एम वृक्षारोपन | ० | ०.०३ | ०.०३ |
| ओ-संकिर्ण | ० | ०.०२ | ०.०२ |
| पी-देखभाल | ० | ०.०४ | ०.०४ |
| आर- दळणवळण | ० | ०.०२ | ०.०२ |
| यु वितरीका | ०.०८ | ० | -०.०८ |
| OFD WORK | ०.०२ | ० | -०.०२ |
| **एकूण** (B) | ०.५ | ४.२४ | ३.७४ |
| **बांधकामे (A+B)** | २.९१ | ३६.८१ | ३३.९१ |
| **अनुषंगिक खर्च** | ०.६ | २.९२ | २.३२ |
| **प्रकल्प एकूण** | ३.५१ | ३९.७३ | ३६.२२ |

| | |
|---|---|
| १) योजनेचे सिंचन क्षेत्र | :- ३८२ हेक्टर |
| २) योजनेचा पाणीसाठा | :- ३.२८५ द.ल.घ.मी. |
| ३) लाभव्यय गुणोत्तर | :- १.०७ > १.० (प्रकल्प मापदंडात बसतो) |
| ४) आर्थिक परतावा दर | : ११.८४ < १२ (मापदंडात बसत नाही) |
| ५) पाणीसाठा किंमत | :- रु. १२०९३३ < १४०५३३ / स.घ.मी.( प्रकल्प मापदंडात बसतो) |